निलंबन रद्द करुन शासन सेवेत पुन:स्थापित करणेबाबत.
**डॉ. पुंडलिक धर्मा बागुल, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (गट-अ)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र. पसंप्र-२०१७/प्र.क्र.८७/पदुम-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ११ मे, २०१७

**शासन आदेश :-**

पशुसंवर्धन विभागातील डॉ. पुंडलिक धर्मा बागुल हे जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (गट-अ) जि.प.नाशिक येथे कार्यरत असताना त्यांच्याविरुध्द लाचेचा सापळा प्रकरणी गु.र.नं.क्र.३०९१/२०१५ लाचलुचपत प्रतिबंधक कायदा १९८८ मधील कलम-७, १३(१)(ड) सह (१३)(२) अन्वये दि. २१.७.२०१५ रोजी पंचवटी पोलीस स्टेशन, नाशिक येथे गुन्हा नोंदविण्यात येऊन त्यांना अटक करण्यात आली. डॉ. बागुल यांना दि. १.९.२०१५ च्या शासन आदेशान्वये अटकेचा दि.२१.७.२०१५ पासून निलंबित करण्यात आले. डॉ. बागुल यांच्या निलंबनास एक वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असून सदर प्रकरणी त्यांच्या विरुध्द न्यायालयात अभियोग दाखल करण्यात आला आहे व विभागीय चौकशी आदेशित करण्यात आली आहे. डॉ. बागुल यांच्या प्रकरणी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि. १४.१०.२०११ मधील ४(ब) येथे नमूद अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने त्यांच्या विरुध्द प्रलंबित न्यायालयीन व विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधिन राहून डॉ. बागुल यांचे निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे. तसेच पुन:स्थापनेनंतर डॉ. बागुल यांची पदस्थापना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदावर करण्यात येत आहे.

| अक्र. | अधिकाऱ्यांचे नांव | निलंबनापूर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | पुन:स्थापनेनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | डॉ. पुंडलिक धर्मा बागुल | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (गट-अ)जि.प.नाशिक | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, खेड, जि.रत्नागिरी (रिक्त पदावर) |

२. संबंधित अधिकारी यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. रुजू झाल्यानंतर रुजू अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१११२०१४८३३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shashank M. Sathe

Digitally signed by Shashank M. Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b4e6443f4621997398029547f71977c2d89e32e391d622c519f39893078c30b, cn=Shashank M. Sathe
Date: 2017.05.11 12:00:06 +05'30'

( श. मा. साठे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,औंध,पुणे.

२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त,मुंबई/नाशिक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. रायगड/नाशिक/रत्नागिरी
४. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, रायगड/नाशिक/रत्नागिरी
५. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जि.प. रायगड/नाशिक/रत्नागिरी
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/नाशिक/रत्नागिरी
७. संबंधित अधिकारी, (द्वारा- आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे)
८. निवड नस्ती.